सार्वजनिक आरोग्य विभागाच्या रुग्णालयातील दंतचिकित्सा विभागाचे बळकटीकरण अंतर्गत राज्यस्तरीय प्रशासनिक विभागातील ५ अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय, क्रमांकः पदआ २०१८/प्र.क्र.११३ /आरोग्य ३
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १५ ऑक्टोबर , २०१८.

वाचा :

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पदआ २०१८/प्र.क्र.११३/आरोग्य-३, दि. २४.०४.२०१८.
२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/रामौआ/५ अदे/दंतचिकित्सा विभाग/३८०/१७, दिनांक: ०६.०४.२०१८

शासन निर्णय :

उपरोक्त क्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या रुग्णालयातील दंतचिकित्सा विभागाचे बळकटीकरण अंतर्गत राज्यस्तरीय प्रशासनिक विभागातील संचालक स्तरावर सुरु करण्यात आलेल्या स्वतंत्र मौखिक आरोग्य कक्षातील ५ अस्थाई पदांना दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक ३०.०९.२०१८ या कालावधीकरीता पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय प्रशासनासाठी संचालक स्तरावर सुरु करण्यात आलेल्या स्वतंत्र मौखिक आरोग्य कक्षातील ५ अस्थाई पदांना दिनांक ०१.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील नमूद लेखाशिर्षाकरीता मंजूर असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा व सन २०१८-२०१९ या वर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - आर - १,

| | | |
|---|---|---|
| “ २२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, |
| ०१ | - | नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा |
| ११० - ७ | - | पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना- राज्य योजना अंतर्गत योजना |
| (०६) (०१) | - | मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०२२६) |

४. हा निर्णय, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- पदनि २०१६/प्र.क्र. ८/आपुक, दिनांक ०७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१२१३२४४३०२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.10.15 14:46:20 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल १/ २ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (आस्थापना), मुंबई.
६. उप संचालक, मौखिक आरोग्य कार्यक्रम.
७. वित्त विभाग (कार्यासन- व्यय-१३/ अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
८. सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प).
९. निवडनस्ती (आरोग्य ३).